**डॉ. बाबासाहेब आंबेडकर श्रमसाफल्य आवास योजना**
**राज्यातील नगरपालिकेतील / महानगरपालिकेतील सफाई कामगारांचे विशिष्ठ स्वरुपाचे काम विचारात घेवून ज्या सफाई कामगारांची सेवा २५ वर्ष किंवा त्याहून अधिक झाली आहे अशा सफाई कामगारांना सेवानिवृत्तीनंतर किंवा सफाई कामगारांचा सेवेत असतांना मृत्यू झाल्यास अशा सफाई कामगारांच्या पात्र वारसास मालकी तत्वावर मोफत सदनिका देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## नगर विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः सकाक-२०१५/सं.क्र.४२/नवि-३४

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ जून, २०१५.

**वाचा -**

१) **शासन निर्णय क्रमांकः सकानि-२००७/प्र.क्र.१७६/२००८/नवि-०६, दिनांक २२.१०.२००८.**
२) **शासन निर्णय क्रमांकः सकानि-२०१२/प्र.क्र.१६६/२०१२/न.वि.०६, दिनांक २८.०३.२०१३.**

**प्रस्तावना -**

राज्यातील महानगरपालिका / नगरपालिकेमधील सफाई कामगारांचे विशिष्ट स्वरुपांचे काम विचारात घेवून ज्या सफाई कामगारांची सेवा २५ वर्षे किंवा त्याहून अधिक झाली आहे अशा सफाई कामगारानां सेवानिवृत्तीच्या वेळी, किंवा सफाई कामगारांचा सेवेत असताना मृत्यू झाल्यास अशा सफाई कामगारांच्या पात्र वारसास महानगरपालिका / नगरपालिकेकडून मालकी हक्काने २६९ चौ.फु. चटई क्षेत्राची सदनिका मोफत देण्यासाठी शासनाने "डॉ. बाबासाहेब आंबेडकर श्रमसाफल्य आवास योजना" राबविण्याचा निर्णय संदर्भाधीन क्रमांक १ येथील दि. २२ ऑक्टोंबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे.

डॉ. बाबसाहेब आंबेडकर श्रमसाफल्य योजनेची प्रभावी अंमलबजावणी व संनियत्रणाची जबाबदारी व योजनेची कार्यपध्दती संदर्भिय क्र.२ येथील दिनांक २८.३.२०१३ च्या शासन निणर्यान्वये विहित केली आहे.

सद्यस्थितीत मुंबई शहरातील व राज्यातील सफाई कर्मचारी व त्यांच्या संघटना त्यांना सद्याच्या सेवानिवासस्थानांच्या जागेवरच मोफत सदनिका उपलब्ध करून देण्यासाठी शासनाकडे वारंवार मागण्या करीत आहेत. या मागण्यांचा विचार करुन डॉ. बाबसाहेब आंबेडकर श्रमसाफल्य योजनेअंतर्गत सेवानिवृत्त सफाई कार्मचाऱ्यांना अथवा सेवेत असताना मृत्यू झाल्यास त्यांच्या पात्र वारसांना सद्याच्या सेवानिवासस्थानाच्या ठिकाणी मालकी हक्काने मोफत सदनिका उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करुन महानगरपालिका / नगरपालिका / नगरपंचायती यांच्या मालकीच्या जमिनीवर असलेल्या सद्याच्या सेवानिवासस्थानांच्या ठिकणी , सफाई कर्मचाऱ्यांची सेवानिवासस्थाने तसेच डॉ. बाबासाहेब आंबेडकर श्रमसाफल्य योजनेच्या निकषानुसार मोफत सदनिका उपलब्ध करुन देण्यासाठी ४.०० या कमाल चटई क्षेत्र निर्देशांकाच्या मर्यादेत बांधण्यात येणाऱ्या सदनिकांपैकी ५० % सदनिका सेवानिवासस्थाने म्हणून व उर्वरित ५० % सदनिका डॉ. बाबासाहेब आंबेडकर श्रमसाफल्य

योजनेअंतर्गत सेवानिवृत्त सफाई कार्मचाऱ्यांना अथवा सेवेत असताना मृत्यू झाल्यास त्यांच्या पात्र वारसांना मालकी हक्काने मोफत उपलब्ध करुन देण्यासाठी शासन मान्यता देत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१५४५४४६१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.06.16 15:48:02 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य,
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
५. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
६. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
७. प्रधान सचिव, महसुल व वन विभाग (महसूल), मंत्रालय मुंबई-३२,
८. प्रधान सचिव, नवि-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१०. प्रधान सचिव, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
११. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका, नगर प्रशासन संचालनालय, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई/नागपूर
१३. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र ½ मुंबई/नागपूर
१४. संचालक, नगर रचना, पुणे
१५. विभागीय आयुक्त, (सर्व)
१६. जिल्हाधिकारी (सर्व)
१७. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१८. मुख्याधिकारी, नगर परिषद (सर्व)
१९. जिल्हा प्रकल्प अधिकारी (सर्व)
२०. सहायक संचालक/नगर रचनाकार सर्व संबंधित महानगरपालिका / नगर परिषद
२१. सर्व कार्यासने नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
२२. निवड नस्ती कार्यासन (न.वि.३४), नगर विकास विभाग, मंत्रालय मुंबई.